# भुताचें घर

लेखिका

श्रीमती तारा रामकृष्ण चौधरी

जयहिंद प्रकाशन

: २० :

मूल्य ४० पैसे

● **मुद्रक**
सर्वदमन शंकर आजगांवकर
मुंबई वैभव प्रेस, ४१७/४२१
सरदार वल्लभभाई पटेल रोड,
गिरगांव—मुंबई नं. ४

*

● **प्रथमावृत्ती**
२० डिसेंबर १९६४

* **नवी आवृत्ती**
१ ऑक्टोबर १९७२

● **प्रकाशक**
ग. का. रायकर
जयहिंद प्रकाशन
झावबाची वाडी, मुंबई २

*

● **मुखपृष्ठ व चित्रें**
चित्रकार परब
गिरगांव–मुंबई


## ● दोन शब्द

**करी मनोरंजन जो मुलांचें ।**
**जडेल नातें प्रभुशीं तयाचें ।।**

शिक्षणाचा प्रसार वाढतो आहे, लोकसंख्या वाढते आहे, त्याबरोबरच सध्यां शिकणाऱ्या आणि अल्पशिक्षित अशा दोघांनाही योग्य असें वाचनीय वाङ्मय उपलब्ध करून देणें जरूरीचें झालें आहे. त्या बालमनाला आणि अन्य साक्षरांना रुचतील, त्यांच्या मनाची पटकन पकड घेतील, अशींच पुस्तकें त्यांच्या हातीं दिलीं पाहिजेत. एवढेंच नव्हे, तर तीं पुस्तकें छोटीं छोटीं असावयास पाहिजेत; तशीच त्यांची किंमतही अल्प असावयास पाहिजे.

राक्षसाच्या गोष्टी, जादूच्या गोष्टी, भुताखेतांच्या गोष्टी, मुलें व मोठीं माणसेंही अत्यंत आवडीनें वाचतात. ही वस्तुस्थिति ध्यानांत घेऊन अशीं प्रकाशनें प्रसिद्ध करण्याची ही योजना मराठीमध्यें तरी अपूर्व अशी आहे. तीन रंगी बाह्यचित्रें, आंतील विषयानुरूप चित्रें आणि सुंदर छपाई यांमुळें तीं चटकन उचलून सर्वांना वाचावींशीं वाटतील. भुताचें घर ही कथा सर्वांना आवडेल.

—**प्रकाशक**

# भुताचें घर

गोपाळराव आणि रामभाऊ हे दोघे मित्र होते. त्यांची मैत्री फारच पक्की होती. लोक तर त्यांना सख्खे भाऊच समजत असत. ते भाऊ नाहींत हें फारच थोड्यांना माहीत होतें. अगदीं बाळपणापासून त्यांची मैत्री होती व म्हातारपणापर्यंत चालत आली होती.

गोपाळराव हे खाऊन पिऊन सुखी गृहस्थ होते. त्यांचें एक चांगलें मोठें घर होतें आणि एक मोठें शेत होतें. ते शेतांत कामधंदा करीत. पीक काढीत व त्यावर सुखानें आपली गुजराण करीत. त्यांना मूलबाळ नव्हतें. त्यामुळें त्यांच्या घरांत ते व त्यांची बायको अशीं दोनच माणसें होतीं.

जरी त्यांना मूलबाळ नव्हतें तरी त्यांच्या घरांत नेहमीं दोनतीन मुलांचा धुडगूस चालूच असायचा. तीं मुलें रामभाऊंचीं होतीं. आणि तीं बहुधा गोपाळरावांकडे खेळत बागडत असत.

गोपाळरावांचे मित्र रामभाऊ हे एक गरीब गृहस्थ होते. त्यांना चार मुलें होतीं. मिळेल ती मोलमजुरी करायची व बायकोमुलांचें पोट भरायचें, असा त्यांचा संसार चाललेला असे. पण एका माणसाच्या कमाईत सहा माणसांचें पोट कसें

भरणार ? अशा परिस्थितींत त्यांना गोपाळरावांचा फार मोठा आधार होता. रामभाऊंचीं चारही मुलें तर वर्षानुवर्षें गोपाळ-रावांच्याच घरीं जेवीत असत. गोपाळराव आणि त्यांच्या पत्नीही त्यांना प्रेमानें खायला प्यायला घालीत. कपडालत्ता करीत. पहाणारांना वाटे कीं, हीं गोपाळरावांचीच मुलें असावींत. इतक्या प्रेमानें त्यांनीं तीं मुलें जवळ केलीं होतीं. आणि त्यामुळें रामभाऊंना आपल्या अगदींच तुटपुंज्या कमाईत कसेबसे दिवस कंठणें शक्य झालें होतें. जर का त्यांना गोपाळरावांचा आधार मिळाला नसता, तर त्यांचे हाल कुत्र्यांनीं खाल्ले नसते.

रामभाऊ गोपाळरावांच्या घराच्या जवळच दुसऱ्या एका घरांत राहात असत. तें घर एक झोंपडेंवजाच होतें व तेंही दुसऱ्याचें होतें. त्यांच्या उत्पन्नांत पोटाची खळगी भरणें कठीण होतें; मग तेथें कपडालत्ता कसा मिळणार ? बिचारे गोपाळराव त्यांनाही मधून मधून कपडालत्ता पुरवीत असत.

हा सगळा प्रकार पाहून असें वाटे कीं, गोपाळराव जणूं वडील बंधु व रामराव जणूं धाकटे बंधु आहेत. रामभाऊंचा बराचसा भार गोपाळराव उचलीत असत.

गोपाळराव खरोखर थोर मनाचे गृहस्थ होते. त्यांना सगेसोयरेही कोणी नव्हते, व मूलबाळही कांहीं नव्हतें. ते म्हणत, चला, ' रामभाऊ जणूं देवानेंच आपल्याला धाकटा

भाऊ पाठवून दिला. स्वतःचा नसला तरी धर्माचा तर आहे ना ? त्याचीं मुलें, तींच आपलीं मुलें. एवींतेवीं आपल्यानंतर कोण खाणार ही संपत्ति ? त्यांच्या नशिबाची आहे; ते खातात बिचारे !'

रामभाऊही चांगले गृहस्थ होते. ते गोपाळरावांशीं फार मायेनें वागत. त्यांना मोठ्या भावासारखा मान देत. त्यांच्या आज्ञेंत राहात. त्यांची सेवाचाकरी बजावीत. गोपाळरावांचे आपल्यावर अनंत उपकार होत आहेत याची त्यांना जाणीव होती.

अशा प्रकारें दोन्ही मित्रांचा काळ चालला होता आणि एके दिवशीं नवल वर्तलें.

गोपाळरावांना मुलगा झाला. त्यांचें व त्यांच्या पत्नीचें वय उतरणीला लागलें होतें. त्यांची मुलाबाळांबद्दलची आशा नष्ट झाली होती. पण परमेश्वराच्या कृपेनें त्यांना पुत्ररत्न लाभलें. गोपाळरावांना फार मोठा आनंद झाला. त्यांनीं गांवांत साखर वांटली, गोरगरीबांना अन्नदान केलें आणि त्याचें नांव धनंजय ठेवलें.

पण गोपाळरावांचा धनंजय जसा आनंद घेऊन आला होता, तसें त्यानें आपल्याबरोबर दुःखही आणलें. त्याचा जन्म झाल्यापासून गोपाळरावांची पत्नी आजारी पडली आणि सहा महिन्यांच्या आंत ती हें जग सोडून गेली.

आतां गोपाळरावांच्या पुढें फार मोठा प्रश्न पडला कीं, ह्या बाळाचें पालन कसें करावें ? आईशिवाय बाळाचें पालन होणें कठीण. निदान कोणी बाई तरी पाहिजे. पुरुषांना लहान मूल



सांभाळतां येणें सोपें नाहीं. ते विचारांत पडले होते आणि त्यांतून मार्गही निघाला.

ज्या दिवशीं धनंजयची आई त्याला सोडून गेली, त्याच दिवसापासून रामभाऊंच्या पत्नी राधाबाई गोपाळरावांच्या

घरीं आल्या आणि त्यांनींच त्या बाळाला सांभाळायला सुरुवात केली. अशा तऱ्हेनें बाळाची सोय तर झाली.

आतां रामभाऊ व त्यांचीं चार मुलेंही गोपाळरावांकडेच राहूं लागलीं. त्या सर्वांचें रहाणें व जेवणखाण गोपाळरावांच्या घरींच होऊं लागलें. ते तेथेंच कायमचे रहायला आले. गोपाळरावही आनंदानें त्या सर्वांना सांभाळूं लागले. राम-भाऊंनीं भाड्याचें घरही सोडून दिलें.

गोपाळरावांचा मुलगा पांच वर्षांचा झाला असेल नसेल, गोपाळराव एके दिवशीं आजारी पडले. थोड्याच दिवसांत त्यांचा आजार बळावला व आतां ह्या आजारांत आपण मरणार याबद्दल गोपाळरावांची खात्री पटली.

गोपाळरावांनीं एके दिवशीं रामभाऊंना आपल्याजवळ बसविलें व ते आपल्या दुःखी आवाजांत बोलूं लागले. ते म्हणाले, " रामभाऊ, तुम्ही माझे मित्र. पण मी तुम्हांला धाकटा भाऊच मानलें आहे. आतां मी जाणार. पण माझें मन गुंतलें आहे धनंजयमध्यें. तो अजून लहान आहे. मी त्याला तुमच्या स्वाधीन करीत आहें. त्याला नीट वाढवा, शिकवा, व तो मोठा झाल्यावर हें घर व शेत त्याच्या स्वाधीन करा. तो मोठा होईपर्यंत तुम्ही ह्या घरांत रहा, आणि शेतांत पेरणी करून उत्पन्न काढा. तें सगळें उत्पन्न तुम्ही घ्या.

तुमच्या मुलाबाळांना खायला घाला व माझ्या बाळालाही सांभाळा. तो मोठा झाल्यावर ह्या पिकाचा पैसा त्याला देऊं नका. तो तुम्ही घ्या. पण घर व शेत मात्र त्याच्या स्वाधीन करा. आतां तो तुमचाच मुलगा आहे असें समजा."

रामभाऊंच्या डोळ्यांत अश्रु आले. त्यांना फार वाईट वाटलें. त्यांचा कंठ दाटून आला. ते म्हणाले, "गोपाळराव, तुम्ही कोणतीही चिंता करूं नका. मी अगदीं तुमच्या शब्दा-प्रमाणें सर्व कांहीं करीन."

दोनचार दिवसांतच गोपाळराव मरण पावले व त्यांचा एकुलता एक मुलगा धनंजय अनाथ झाला.

गोपाळरावांचा मुलगा रामभाऊंच्या कुटुंबांत वाढत होता. जसजसे दिवस जात होते, तसतसें रामभाऊंच्या व त्यांच्या बायकोच्या डोक्यांत एक निराळेंच विचारचक्र सुरू झालें होतें. बहुधा दोनचार दिवसांआड तीं दोघें एकत्र बसत व त्यांच्या कांहींतरी गोष्टी चालत. त्या गोष्टी अगदीं गुप्तपणें चालत असत. त्यांचीं मुलेंही त्या वेळीं त्यांच्याजवळ नसत. त्या दोघांशिवाय कोणाही तिसऱ्याला त्या गोष्टी कळूं द्यायच्या नाहींत असाच त्यांचा बेत होता. त्यांची खूप चर्चा होई. पण निकाल मात्र कांहींही घेतला जात नसे. अशा चर्चेंत दिवसांमागून दिवस निघून जात होते.

रामभाऊ आतां गोपाळरावांची संपत्ति ही आपलीच आहे अशा थाटांत वागूं लागले होते. ते दररोज नियमानें बैलगाडी

जोडायचे व शेतांत जायचे. तेथें दिवसभर कामधंदा करून घरीं परत यायचे. अशा तऱ्हेनें काळ लोटला गेला व एक हंगाम येऊन गेला. त्या हंगामांत रामभाऊंना त्या शेतांत खूपच पीक मिळालें. त्यांचा वर्षाचा सगळा खर्च जाऊन त्यांच्याजवळ बरीच माया शिल्लक राहिली आणि ती शिल्लक राहिलेली माया पाहून रामभाऊंचे डोळे फिरले. त्यांच्या मनांत पाप आलें, आणि त्यांच्या व त्यांच्या बायकोच्या होणाऱ्या गप्पागोष्टींत त्यांनीं एक निराळाच बेत रचला. कोणालाही वाटणार नाहीं, कोणालाही कळणार नाहीं, अशा पद्धतीनें सगळ्या गोष्टी पार पाडायची त्यांनीं योजना आंखली.

दोनचार दिवसांतच रामभाऊ व गोपाळरावांचा सहा वर्षांचा धनंजय गांवाला जायला निघाले. जातांना गांवांतील लोकांनीं विचारलें, "काय रामभाऊ, कोठें जातां? नेतां कुठें गोपाळरावांच्या पोराला?"

रामभाऊ म्हणाले, "त्याला त्याच्या मावशीकडे नेतों. तेथेंच ठेवणार आहे मी त्याला. तेथें तो शाळेंत जाईल व त्याचें शिक्षणही होईल. गोपाळरावांची ठेव चांगली जतन केली पाहिजे ना!"

"हो! हो! बरं! न्या हं! देवाचंच लेंकरूं आहे आतां तें. देव ठेवील त्याच्यावर नजर!" असें लोक म्हणत व पुढें जात.

रामभाऊ धनंजयला घेऊन निघाले. कधीं पायीं तर कधीं बैलगाडींत. असा प्रवास करीत ते दोघे आठ दहा दिवसांनीं एका गांवाला पोंचले.

त्या गांवांत रामभाऊ त्या मुलाला एका घरीं घेऊन गेले. रात्रीं त्यांनीं तेथें मुक्काम केला. बिचारा धनंजय प्रवासाच्या दगदगीला कंटाळलेला होता. चटकन झोंपला.

रामभाऊंनीं गांवाहून निघतांना लोकांना सांगितलें कीं, "गोपाळरावांच्या मुलाला त्याच्या मावशीकडे पोंचवितों." पण धनंजयला मुळीं मावशीच नव्हती. ज्या घरीं ते आले होते, तें होतें रामभाऊंच्या मेहुणीचें घर. रामभाऊंच्या मुलांच्या मावशीचें घर होतें तें.

रात्रभर रामभाऊ, त्यांची मेहुणी आक्काबाई व तिचा नवरा सखारामभाऊ यांच्या कांहीं तरी महत्त्वाच्या गोष्टी चालल्या होत्या. रामभाऊ म्हणाले, "पहा, आतां ही संधी आली आहे. आम्ही सुखी होणं तुमच्या हातीं आहे. ह्या मुलाला तुम्ही तुमच्या येथेंच ठेवा व तूं नोकर आहेस असें त्याला उद्यांपासूनच सांगा. तो आमचें गांव व आम्हांला विसरला पाहिजे, आणि त्यांचें घर व शेत कायमचें आमच्या पदरांत पडलें पाहिजे. हें काम फत्ते झालें कीं तुम्हांलाही फार मोठें बक्षिस देऊं. समजलांत!"

मोठ्या बक्षिसाच्या लोभानें आक्काबाई व तिचा नवरा ह्या गोष्टीला तयार झालीं, आणि प्रहरभर रात्र असतांच रामभाऊ तेथून परतले.

सकाळीं धनंजय उठला व रामूकाका! रामूकाका! म्हणून हांका मारूं लागला. पण तेथें रामूकाका होते कोठें? त्यांनीं

रात्रींच तेथून पोबारा केला होता. तो मुलगा उठला व रडूं लागला.

तोंच आक्काबाई तेथें आली, आणि जणूं वीजच कडाडली. "काय रडतोस रे कार्ट्या, येथें कोणी नाहीं तुझे रामूकाका. चल, रडणं बंद कर. तूं तर येथला नोकर आहेस. समजलास?"



सहा वर्षांचा लहानगा धनंजय घाबरला व चूप बसला. आणि त्याच क्षणीं ती बाई म्हणाली, "हा झाडू घे व हें घर झाडून काढ."

बिचारा धनंजय घर झाडूं लागला. तो फार दुःखी झाला.

याला सारखें रडें येई. पण तो रडूं शकत नव्हता. त्याला या बाईची भीति वाटत होती.

आतां धनंजय त्या घरांतील गडी म्हणून काम करीत होता. तो घर झाडून काढी. बिछाने घाली. घरांतील इतर बरींच कामें करी; पण त्याला खायला तरी काय देत? कधीं सुकी तर कधीं ओली. तो बऱ्याच वेळां रडे, तोही एका कोंपऱ्यांत जाऊन. त्याचें रडें कोणाला ऐकूं येत नसे. तो गुपचूप रडे व डोळ्यांतून अश्रु ढाळी. त्याला त्याच्या वडिलांची आठवण येई; रामूकाकांची आठवण येई; पण तेथें कोणी नव्हतें. तेथें होती फक्त आक्काबाई. ती त्याला सारखी छळीत असे. तें सहा वर्षांचें बिचारें पोर अगदीं सुकत चाललें होतें.

पण वाईट माणसें ज्याचें वाईट करायला धडपडतात, तेथेंच देव त्याला वांचवायला धांवतो. त्या घराशेजारीं सुंदरराव नांवाच्या एका श्रीमंत माणसाचें घर होतें, आणि त्यांचा संजय नांवाचा एक मुलगा होता. तो मुलगा ह्या आक्काबाईकडे बऱ्याच वेळां तिच्या मुलांबरोबर खेळायला येत असे. त्याची व धनंजयची लवकरच मैत्री जुळली. संजयला ह्या पोरक्या मुलाबद्दल प्रेम वाटायला लागलें, व त्याचे चाललेले हाल पाहून त्याला वाईटही वाटे. अखेरीस संजयनें हा सगळा प्रकार आपल्या बापाला सांगितला, आणि त्यावर तो म्हणाला, "बाबा, धनंजयला आपल्या घरीं आणा ना? तो चांगला मुलगा आहे. माझा मित्र आहे. मला तो आवडतो. मी त्याच्याबरोबर खेळेन."

सुंदररावांनीं धनंजयबद्दल बरीच चौकशी केली. तेव्हां त्यांना आक्काबाईनें सांगितलें कीं, "हा एक अनाथ मुलगा आहे. आम्ही त्याला असाच ठेवून घेतला आहे कामाधंद्याला."

त्यावर सुंदरराव म्हणाले कीं, "त्या मुलाला माझ्याकडे नोकरीला पाठवून द्या. मी त्याला खायला घालीन. उलट त्याला पांच रुपये दरमहाचा पगार तुम्हांला देत जाईन."

ही गोष्ट आक्काबाईला पसंत पडली व तिनें त्या मुलाला सुंदररावांकडे नोकरीला पाठवून दिलें. धनंजय त्या दिवसा-पासून सुंदररावांच्या मुलाच्या संगतींत सुखानें वाढूं लागला. तो त्याच्याबरोबर शाळेंत जाऊं लागला व त्याच्याबरोबर खेळूं लागला. ते दोघे मुलगे पक्के मित्र झाले.

इकडे रामभाऊ घरीं परत आले व रोजच्या कामाला लागले. पण त्यांचें मन आनंदी नव्हतें. आपण आपल्या मित्राचा विश्वासघात केला हें त्यांना सारखें खटकत होतें, पण हळूहळू ते सर्व विसरून गेले आणि तें घर व शेत जणूं काय आपलेंच आहे असे वागूं लागले.

एके दिवशीं रामभाऊ अगदीं सकाळीं उठले. अजून उजाडलेंही नव्हतें. जिकडे तिकडे पहांटेपूर्वीचा काळोख होता. रामभाऊंनीं गाडी जुंपली व शेतावर जायला निघाले.

आज ते अजून थोडेसे झोंपेच्या गुंगींत होते. बैल नेहमींच्या सरावाचे होते म्हणून जातील सरळ शेतांत, अशी त्यांना खात्री होती; म्हणून ते अर्धवट गुंगींतच गाडी हांकीत

होते. पण आज बैलांनीं नेहमींचा रस्ता सोडला व ते सरळ स्मशानाच्या वाटेला लागले. त्यांनीं ती गाडी स्मशानांत नेली व ज्या ठिकाणीं गोपाळरावांचें दहन झालें होतें, त्या ठिकाणीं जाऊन ते उभे राहिले.

त्याच क्षणीं एक पांढरीशुभ्र आकृति तेथें उत्पन्न झाली. ती आकृति अगदीं गोपाळरावांसारखी होती. ती आकृति त्या



गाडीजवळ आली. तिनें त्या बैलांवरून हात फिरवले. ते बैलही गोपाळरावांचेच होते. त्यामुळें त्या बैलांना बरें वाटलें. नंतर ती आकृति त्या गाडीवर चढली. तिनें प्रथम राम-भाऊंच्या डोक्यावरून हात फिरविले व ती त्या गाडींत बसली.

रामभाऊ आतांपर्यंत अर्धवट झोंपेंतच होते. त्यांनीं पाहिलें व ओळखलें. आणि आतां तर ते चांगलेच भ्रमांत पडले होते.

ती आकृति म्हणाली, "रामभाऊ, चला, गाडी परत फिरवा. इतक्या सकाळीं शेतांत जाण्याची काय गरज ?"

रामभाऊंनीं गाडी परत फिरविली. थोड्याच वेळांत ती गाडी घरीं आली. एका क्षणांत ती आकृति गाडींतून खालीं उतरली व भरकन घरांत शिरली. ती सरळ माजघरांत गेली व तेथेंच गुप्त झाली.

रामभाऊंनीं गाडीचे बैल सोडून गोठ्यांत बांधले व ते घरांत आले. आणि त्यांनीं हांक मारली, "गोपाळराव, अहो गोपाळराव !"

त्याचवेळीं राधाबाई सामोरी आली नि म्हणाली, "काय वेड लागलें काय तुम्हांला ? अहो, गोपाळरावांना मरून वर्ष झालें !" मग रामभाऊ शुद्धीवर आले. ते म्हणाले, "अरे हो ! गोपाळराव तर वारले. पण मग गाडींत बसून माझ्याबरोबर आले होते कोण ? गोपाळरावच ते ! नाहीं, गोपाळराव मेले नाहींत. ते ह्या घरांत आहेत. आतांच घरांत शिरले." इतके बोलून रामभाऊ गोपाळरावांना शोधण्यासाठीं घरांत शिरले. त्यांनीं सगळें घर शोधलें; पण त्यांना कांहीं गोपाळराव सांपडले नाहींत.

गोपाळराव घरांत शिरले असें रामभाऊ सारखे म्हणत, पण त्यांच्या शब्दावर कोणीही विश्वास ठेवीना. त्यांच्या बायकोनें व मुलांनीं त्यांना वेड्यांतच काढलें.

आतां रामभाऊ सारखे विचार करूं लागले. हा काय प्रकार आहे ? गोपाळराव तर वारले. ते आले कसे व घरांत

शिरले कसे ? ते इतरांना कोणालाही दिसले नाहींत कसे ? ते रात्रंदिवस ह्याच विचारांत गढून जात. त्यांचें कामधंद्यावरील लक्ष मात्र उडालें.

दोनचार दिवस असेच निघून गेलें. एके दिवशीं रामभाऊ माजघरांत गेले आणि ते दचकले. तेथें एका कोंपऱ्यांत गोपाळराव उभे होते. अगदीं हुबेहुब तशीच आकृति व तसाच पोषाख. त्यांचे डोळे एकटक रामभाऊंवर खिळले होते. रामभाऊ एकदम घाबरले व धांवतच माजघरांतून बाहेर गेले. त्यांनीं घडलेला प्रकार बायकोला सांगितला.

रामभाऊ बायकोला बरोबर घेऊन पुन्हां माजघरांत परत आले व ते त्या कोपऱ्याकडे बोट दाखवून बायकोला दाखवूं लागले. पण तेथें कोणी नव्हतें. पुन्हां बायकोनें त्यांना वेड्यांत काढलं.

आतां मात्र रामभाऊ घाबरूं लागले. हें गोपाळरावांचें भूत आहे हें त्यांनीं ओळखलें. हें घर सोडून गेलें पाहिजे असेंही त्यांना वाटूं लागलें.

त्यांनीं दुसऱ्याच दिवशीं ही गोष्ट बायकोला व मुलांना सांगितली, पण त्यांनीं रामभाऊंना खुळा ठरविलें आणि त्यांची टिंगल केली. त्यांनीं तें घर सोडण्याचें साफ नाकारलें. कांहीं केल्या ती मंडळी तें घर सोडून जायला तयार नव्हती. एवढी सुखाची संपत्ति सहज कोण सोडणार बरें !

एके दिवशीं मध्यरात्रीची वेळ होती. रामभाऊ खाटेव झोंपले होते. पण त्यांना झोंप कांहीं येत नव्हती. ते सारख गोपाळरावांचा विचार करीत होते. आणि त्याच वेळीं त्यांच्य उशाच्या मागच्या बाजूनें ती आकृति आली. ती समो आली. रामभाऊंची नजर त्या आकृतीकडे गेली व ते ओरड णार, तोंच त्या आकृतीनें रामभाऊंच्या तोंडावर हात ठेवल व त्यांचें ओरडणें बंद केलें. नंतर ती आकृति रामभाऊंच्य छातीवर बसली व तिनें त्यांचा गळा दोन्ही हातांनीं दाबायल सुरुवात केली. रामभाऊ ओरडण्याचा प्रयत्न करीत, त्या वेळ ती आकृति त्यांचा गळा जोरानें आंवळी. त्यामुळें त्यांना मोठ्यानें ओरडतांही येईना.

थोड्याच वेळांत त्या आकृतीनें रामभाऊंचा गळा सोडला. ती त्यांच्या छातीवरून खालीं उतरली आणि निघून गेली.

त्याच वेळीं रामभाऊ तेथून उठले व बाहेर जाऊन रात्रभर जागत बसले.

सकाळीं त्यांनीं ती हकीकत आपल्या बायको-मुलांना सांगितली. पण ती कोणी रामभाऊंचें म्हणणें खरें मानायला तयारच होत नव्हतीं. कारण त्यांना कधींही गोपाळरावांचें भूत म्हणा, कीं कोणतीही आकृति म्हणा, तेथें दिसली नव्हती.

पण त्या दिवशीं रामभाऊ बायकोला म्हणाले, "हें पहा, तें कांहीं नाहीं. मी उद्यां जातों व गोपाळरावांच्या मुलाला घेऊन येतों. त्याची संपत्ति त्याच्या स्वाधीन करतों.

आपणांला हें घर सोडलेंच पाहिजे. नाहींतर माझा मृत्यु ओढवेल अशी मला भीति वाटते." पण त्यांच्या बायकोनें व मुलांनीं त्यांना तसें करण्याला एकदम मनाई केली. कारण त्यांची दृष्टि स्वार्थानें धुंद झाली होती. त्यांनाही फुकट मिळालेली संपत्ति घालवायची नव्हती. त्यांना वाटलें कीं, ह्यांना आतां वेड लागलें आहे. त्यांना जर का घराच्या बाहेर जाऊं दिलें, तर हे खरेंच जाऊन गोपाळरावांच्या त्या काव्यांला घेऊन येतील. म्हणून त्या सर्वांनीं विचार केला व त्याच वेळीं रामभाऊंना त्यांनीं माजघरांत कोंडून टाकलें.

रामभाऊ फार घाबरले. त्यांनीं नानापरीनें बायकोला व मुलांना सांगून पाहिलें, पण त्यांना कोणीही बाहेर काढीना. रात्र होत आली आणि रामभाऊंना भीति वाटूं लागली. ते मोठमोठ्यानें माजघरांत ओरडूं लागले. तें घर बरेंच मोठें होतें. माजघरांतील आवाज बाहेर जाणें शक्य नव्हतें. त्यामुळें रामभाऊंच्या ओरडण्याकडे बाहेरच्या कोणाचेंही लक्ष गेलें नाहीं.

मध्यरात्रीची वेळ होती. आणि त्या माजघरांतील एका कोंपऱ्यांतून गोपाळरावांची आकृति प्रकट झाली. त्या आकृती-कडे पाहून रामभाऊंनीं एकच आरोळी ठोकली. पण तेथें कोणी आलें नाहीं. ती आकृति रामभाऊंच्याजवळ आली. तिनें आपले दोन्ही हात रामभाऊंच्या गळ्यांत घातले. तिनें त्यांचा गळा आंवळला आणि त्याच क्षणीं रामभाऊंचे प्राण निघून गेले.

त्यांचे प्रेत धाडकन जमिनीवर पडलें व गोपाळरावांची आकृति तेथेंच अदृश्य झाली.

सकाळीं पहातात तों रामभाऊ मेलेले.

आतां मात्र राधाबाईच्या मनांत धस्स झालें. जरूर येथें कांहीं धोका असावा असें तिला वाटायला लागलें, आणि तिनें गोपाळरावांच्या भुताचा बंदोबस्त करायचें ठरविलें.

तिनें एक मांत्रिक आणला. त्याला चांगलें खायला-प्यायला घातलें. त्याला कांहीं रुपये दिले आणि त्या भुताला बाटलींत भरून दूर रानांत कुठेंतरी पुरून टाकायला सांगितलें.

रात्रीं माजघरांत त्या मांत्रिकाचें मंत्रतंत्र सुरू झाले. त्या मांत्रिकानें समोर एक बाटली ठेवली होती व तो सारखा मंत्र म्हणत होता. पण गोपाळरावांचें भूत कांहीं प्रकट होईना व त्या बाटलींत जाईना. चांगले घटकाभर त्याचे मंत्र चालू होते. पण तें भूत बाटलींत बंद होण्याऐवजीं उलटाच प्रकार झाला. ती बाटली जमिनीवरून एकदम सरकन वर गेली आणि एकदम राधाबाईच्या डोक्यावर आदळली. ती बाटली फुटली व राधाबाईच्या डोक्यांतून रक्ताची धार वाहूं लागली.

लगेच राधाबाई तेथून बाजूला झाल्या. आतां तो मांत्रिक संतापला व हट्टाला पेटला. म्हणाला, "मी इतका पट्टीचा मांत्रिक अन् भूत ऐकत नाहीं! याला बाटलींत भरीन तेव्हांच

नांवाचा मांत्रिक !" त्यानें दुसरी बाटली समोर ठेवली व पुन्हां मंत्रतंत्र सुरू केलें.

पण जसा मांत्रिक संतापला, तसें गोपाळरावांचें भूतही खवळलें. त्यानेंही आपला पराक्रम दाखवायला आरंभ केला. पुन्हा ती बाटली सरळ वर गेली आणि खालीं येऊन आदळली



ती मांत्रिकाच्या डोक्यावरच. ती बाटली फुटून तिचे तुकडे तुकडे झाले. मांत्रिकाचेंही डोकें फुटलें व रक्त वाहूं लागलें.

आतां मांत्रिक आणखी संतापला व तो मंतरलेले तांदूळ त्या माजघरांत फेंकूं लागला. त्या मंत्रानें गोपाळरावांचें भूत हैराण होऊं लागलें. पण तें भूत हरलें नाहीं. कारण तें भूत कोणाचेंही वाईट करायला आलें नव्हतें तें केवळ आपल्या मुलाचे, घराचे व शेताचे हक्क राखायला आपल्याच घरांत

आलें होतें. त्या भुतानें चटकन त्या जादूगाराचा अंगरखा धरला व जोरानें ओढला. त्याचा अंगरखा फाटला आणि तो अंगांतूनच निघाला. जादूगार उघडा झाला. दुसऱ्याच क्षणीं त्या भुतानें त्या जादूगाराचें धोतर धरलें व एक हिसडा मारला. मोठ्या प्रयत्नानें जादूगारानें आपलें धोतर सांवरलें.

जादूगारानें ओळखलें कीं, आतां कठीण प्रसंग आहे. अधिक हट्टाला पेटणें बरें नाहीं. अंगरखा तर गेला. धोतर गेलें तर भयंकर फजिती होईल. मांत्रिक हरला. लगेच तो मांत्रिक बोलूं लागला, " भुता, मला क्षमा कर. मी जातों येथून, पुन्हां येणार नाहीं." आणि त्याच वेळीं तो मांत्रिक तेथून निघून गेला.

आतांपर्यंत ह्या घरांत ही जी भुताटकी चालली होती, ती गुप्तच होती. पण आतां मात्र त्या जादूगारानें ही सगळी हकीकत गांवांत फोडली. ती सगळ्या लोकांना माहीत झाली आणि त्याच दिवसापासून त्या गांवांतील सगळे लोक गोपाळरावांच्या त्या घराला 'भुताचें घर' म्हणूं लागले.

इतके प्रकार झाले तरी राधाबाई कांहीं तें घर सोडायला तयार नव्हत्या. कारण तें घर व शेत गडप करण्याची मूळची कल्पना त्यांचीच होती, आणि अजूनही त्यांना तो धनलोभ सुटत नव्हता. आतां काय करावें? ह्या भुताचा बंदोबस्त कसा करावा? याचाच त्या सारखा विचार करीत होत्या.

एके दिवशीं दुपारची वेळ होती. चारही मुलें जेवायला बसलीं होती आणि राधाबाई त्यांना वाढीत होत्या. त्यावेळीं भुताटकीला आरंभ झाला. एका मुलाच्या समोर पाण्यानें भरलेला तांब्या जोरानें एकदम वर जाऊन छतावर आपटला आणि तसाच परत आला तो त्याच्या ताटांत आपटला. अन्न सगळीकडे उडालें. क्षणभरांत त्या मुलांच्या समोरचीं ताटें गरगरां फिरूं लागलीं. त्यांना जेवणें अशक्य झालें. बिचारीं मुलें म्हणालीं, "आई, आतां तूं हट्टाला पेटूं नकोस. बाबा गेलेत, आतां आमचाही नाश होईल येथें. हें घर आपल्याला सोडलेंच पाहिजे. भुताच्या घरांत कसें राहतां येईल ? जेथें मांत्रिक हटला, तेथें आपला काय पाड ?"

पण राधाबाई कांहीं बोलल्या नाहींत. त्या गप्प बसल्या. आणि त्याच रात्रीं—मध्यरात्र उलटून गेली होती. राधाबाई विचार करीत होत्या. तोंच त्या घराच्या खिडक्या थाडथाड आपटूं लागल्या; आणि ताडताड कांचा फुटल्या. दारें धाड-धाड आपटूं लागलीं व कांहीं फडताळें मोडलीं. राधाबाई खाटेवरच उठून बसल्या. बाहेर वारा तर सुटलेला नव्हता. मग खिडक्या-दारें आपटतात कशीं ? याचा त्या विचार करीत होत्या. तोंच तिच्यासमोर भिंतीशीं टेंकून एक पांढरी आकृति प्रकट झाली.

ती गोपाळरावांप्रमाणें अगदीं हुबेहुब दिसत होती. ती आकृति प्रथम हंसली.' हाऽहाऽहाऽहीऽहीऽहीऽ. नंतर

बोलूं लागली. म्हणाली, "राधाबाई, माझ्या लहानग्या बाळाला देशोधडीला लावून त्याची संपत्ति लुटायला बसलांत काय? मित्रद्रोह करणारा नरकांत गेला. मींच रवाना केला त्याला. आतां तरी शहाण्या व्हा. माझ्या बाळाला येथें घेऊन या. ही सारी संपत्ति त्याच्या स्वाधीन करा, आणि तुम्ही सगळीं ह्या गांवांतून तोंड काळें करा. मी तुंम्हाला एक पैसा खाऊं देणार नाहीं ह्या संपत्तींतला. अधिक हट्ट कराल, तर प्राण गमवाल. तुमचा वंश नष्ट होईल सगळा!"

राधाबाई घाबरल्या होत्या. त्या फार फार घाबरल्या होत्या. त्या सारख्या थरथर कांपत होत्या. त्यांनीं हात जोडले होते. त्यांच्या तोंडांतून फक्त एकच वाक्य बाहेर पडलें, "गोपाळभाऊजी, तुम्हीं सांगितलें, तसेंच करतें. मला क्षमा करा."

मग ती आकृति भिंतीपासून राधाबाईच्या खाटेजवळ आली व तिनें ती खाट उचलून फेंकली. राधाबाई भिंतीवर आदळल्या आणि चांगल्या ठेंचाळल्या. त्या आकृतीचे डोळे लालजर्द दिसत होते. तेथेंच ती आकृति गुप्त झाली.

दुसऱ्याच दिवशीं राधाबाईनें मुलांसह तें घर सोडलें आणि गोपाळरावांच्या मुलाला आणायला त्या रवाना झाल्या.

चारआठ दिवसांत धनंजय तेथें आला. मुलगा आतां थोडा मोठा झाला होता. राधाबाईनें त्या गांवचे पंच गोळा

केले व त्यांच्यासमोर तें घर, शेत व घरांतील सगळी मालमत्ता त्या मुलाच्या स्वाधीन केली आणि तिनें आपल्या चारही मुलांसह तो गांव सोडला.

ही सगळी हकीकत ऐकून पंचमंडळी म्हणाली, "हरामाचें कुणालाच पचत नाहीं. गोपाळराव, छान केलंत तुम्ही!"

त्या गांवच्या पंचांनीं त्या संपत्तीची नीट व्यवस्था लावली व तेथील सरपंचांनीं गोपाळरावांच्या धनंजयचा सांभाळ करण्याची जबाबदारी घेतली.

गोपाळरावांचें भूत शांत झालें व स्मशानांत निघून गेलें. आज गोपाळरावांच्या घरांत दररोज संध्याकाळीं भजन होत असतें व गोपाळरावांचा मुलगा धनंजय गोड आवाजांत भजन गात असतो.

तें भुताचें घर आज देवाचें मंदिर बनलें आहे.

••• समाप्त •••